**अर्थसंकल्पीय अनुदान-सन २०२४-२५**
**स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II अंतर्गत**
**सर्वसाधारण घटकाखाली (केंद्र हिस्सा)**
**निधी वितरित करणेबाबत...**
**(लेखाशीर्ष २२१५ ९८३५)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः **स्वभामि-२०२४/प्र.क्र.६१/पापु-०८**
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २९ जुलै, २०२४

वाचा

१. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक: क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४**
२. **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक: S-१२०११/१०/२०२२-SBM-DDWS, दिनांक ०४/०७/२०२४.**
३. **वित्त विभागाचा दि.२२.०७.२०२४ रोजीचा ई-मेल**

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II योजनेअंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी (२२१५ ९८३५) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरीता केंद्र हिश्याकरिता रु.१२६२००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. वाचा क्र.२ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II सर्वसाधारण घटक अंतर्गत पहिल्या हफ्त्याच्या पहिल्या ट्रांचकरिता रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यात आला आहे. सदर योजनेकरिता राज्य पाणी व स्वच्छता मिशन State Nodal Account (SNA) घोषीत असून सदर रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतका निधी, आहरीत करुन, योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात जमा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II योजनेअंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी राज्य शासनाकडे जमा केंद्र हिस्सा रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन कडील योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II सर्वसाधारण घटक अंतर्गत, (२२१५ ९८३५) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरीता केंद्र हिस्सा रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतका निधी, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात आहरित करुन, योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात जमा करण्यासाठी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-II योजनेच्या State Nodal Account (SNA) खात्यात जमा करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती राणी दि. देवकत्ते, कार्यासन अधिकारी , पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव श्रीम.नेत्रा मानकामे, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी श्रीमती राणी दि. देवकत्ते, कार्यासन अधिकारी , पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांनी सदर रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून, राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या स्वच्छ भारत अभियान (ग्रा) टप्पा-II योजनेच्या SNA खात्यात जमा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.-

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.-

I. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

II. संबंधित संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

III. अट क्र.I आणि II यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

IV. सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

V. ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-०८ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

VI. राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

VII. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

VIII. सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. सदर रु.५३५९.२० लक्ष (रूपये त्रेपन्न कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) इतकी रक्कम " मागणी क्र.Y-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, ०२ ग्रामीण स्वच्छता कार्यक्रम, (०२) (१०) स्वच्छ भारत मिशन, केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ) (२२१५ ९८३५), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५करिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२६१७३५२६९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=0fea5cae29d80a4f500842e3ec1a32608f603b343a904f1f366c9491356ac06d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2024.07.29 15:48:46 +05'30'

( श्रीमती राणी दि. देवकत्ते )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. उपसचिव, (कार्यासन पापु-०८/१६), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
५. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
६. अभियान संचालक(स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर.
७. अतिरिक्त अभियान संचालक(स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर
८. जिल्हा समन्वयक, स्वच्छ भारत मिशन/उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
९. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१२. नियोजन विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, कार्यासन पापु-०८ .